**दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ नुसार, महसूल व वन विभागाच्या अखत्यारीतील, नोदंणी व मुद्रांक विभाग आस्थापनेवरील गट-अ ते गट-ड या संवर्गात पदोन्नती देणेकरीता दिव्यांग पद सुनिश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्र.आस्थाप-२०२१/७८६/प्र.क्र.१०६/म-१**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांकः- २५ मार्च, २०२५.**

**वाचा :-** १) दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनिमय, २०१६.
२) केंद्र शासनाच्या सामाजिक न्याय व अधिकारीता मंत्रालय, नवी दिल्ली यांची दि.०४.०१.२०२१ अधिसूचना.
३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र.दिव्यांग-२०१९/ प्र.क्र.२५१/दि.क.२, दि.१२.११.२०२०
४) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र.दिव्यांग-२०१३/प्र.क्र.३५/दि.क्र.२, दि.०७.१०.२०१६.
५) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन परिपत्रक क्र.दिव्यांग-२०१२/प्र.क्र.३२/दि.क.-२, दि. ०१.०२.२०२१
६) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र.दिव्यांग-२०१९/प्र.क्र.२५१/दि.क्र.२, दि.०२.०२.२०२१
७) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांच्याअध्यक्षतेखाली तज्ञ समितीची दि.२२ व २३ फेब्रुवारी, २०२१ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
८) शासन निर्णय क्र.आस्थाप-२०२१/७८६/प्र.क्र.१०६/म-१, दि. २५/६/२०२१.
९) शासन निर्णय क्र.आस्थाप-२०२१/७८६/प्र.क्र.१०६/म-१, दि. १६/७/२०२१.
१०) शासन शुध्दीपत्रक क्र.आस्थाप-२०२१/७८६/प्र.क्र.१०६/म-१, दि. ९/७/२०२४.
११) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.दिव्यांग-२०२२/प्र.क्र८३/१६-अ, दि.२०/४/२०२३.

**प्रस्तावनाः-**

दिव्यांग व्यक्ति हक्क अधिनियम, २०१६ मधील कलम ३३ नुसार, नोंदणी व मुद्रांक विभाग आस्थापनेवरील गट-अ ते गट-ड या संवर्गातील पदे, तज्ञ समितीच्या शिफारशीनुसार संदर्भ क्र.८, ९ व १० येथील दि.२५/६/२०२१, दि.१६/७/२०२१ व दि.९/७/२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिव्यांगाकरीता सुनिश्चित करण्यात आली आहेत.

दरम्यान, सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र.११ येथील दि.२०/४/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये, दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-ड मधून गट-ड मधील, गट-ड मधून गट-क मधील, गट-क मधून गट-क मधील, गट-क मधून गट-ब मधील, गट-ब मधून गट-ब मधील, गट-ब मधून गट-अ मधील निम्नस्तरापर्यंतच्या (Lowest rung of group "A") नियुक्तीस योग्य ठरविलेल्या पदांवर (Identified Posts) दिव्यांग प्रकारानुसार पदोन्नतीमध्ये ४% आरक्षण मंजूर केले आहे.

नोंदणी व मुद्रांक विभागाच्या आस्थापनेवरील दिव्यांगाकरीता दि.२५/६/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुनिश्चित करण्यात आलेले दिव्यांग प्रकार व सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२०/४/२०२३ मध्ये पदोन्नती करीता नमूद दिव्यांग प्रकार सुसंगत नसल्याचे आढळून आल्याने दि.२५/६/२०२१ रोजीच्या शासन निर्णयामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**(कृ.मा.प.)**

**शासन शुध्दीपत्रकः-**

नोंदणी व मुद्रांक विभागाच्या आस्थापनेवरील दिव्यांगाकरीता दि.२५/६/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये पद सुनिश्चित करण्यात आलेल्या दिव्यांग प्रकार सुनिश्चितीमध्ये बदल न करता, सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२०/४/२०२३ शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार पदोन्नतीमध्ये द्यावयाच्या ४% दिव्यांग आरक्षणाच्या दिव्यांग प्रकारामध्ये सुसंगतता आणण्यासाठी, या विभागाच्या दि.२५/६/२०२१ रोजीच्या शासन निर्णयामधील दिव्यांग पद सुनिश्चितीच्या केवळ क्रमवारीमध्ये बदल करून पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

| **दि.२५/६/२०२१ रोजीच्या शासन निर्णया मध्ये नमूद** | | | | **सुधारित दिव्यांग प्रकार (सा.प्र.वि.च्या दि.२०/४/२०२३ रोजीच्या शासन निर्णयानुसार)** |
|---|---|---|---|---|
| **अ क्र** | **पदनाम** | **शारिरीक पात्रता** | **दिव्यांग प्रवर्ग** | |
| ३ | सह नोंदणी महानिरीक्षक तथा मुद्रांक अधीक्षक (मुख्यालय) | S, BN, RW, SE, C, MF | a) HH<br>b) OL, OA, PD, LC<br>c) MD involving above a to b | a)काही नाही<br>b) HH<br>C) OL, OA, PD, LC<br>D) MD involving above b to c |
| ४ | नोंदणी उपमहानिरीक्षक (मुख्यालय), पुणे | | | |
| ५ | नोंदणी उपमहानिरीक्षक (संगणकीकरण), पुणे | | | |
| ६ | विभागीय नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक | | | |
| ७. | सह जिल्हा निबंधक वर्ग -१ तथा मुद्रांक जिल्हाधिकारी | | | |
| ८ | सह जिल्हा निबंधक वर्ग -२ तथा प्रशासकीय अधिकारी | S, BN, RW, SE, C, MF | a) HH<br>b) OL, LC, DW, AAV<br>c) MD involving above a to b | a) काही नाही<br>b) HH<br>C) OL, LC, DW, AAV<br>D) MD involving above b to c |
| १५ | दुय्यम निबंधक श्रेणी-१ | S, BN, RW, SE, C, MF | a) HH<br>b) OL, LC, DW, AAV<br>c) MD involving above a to b | a)काही नाही<br>b) HH<br>C) OL, LC, DW, AAV<br>D) MD involving above b to c |

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२५०३२५१८१००२२०१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ

Digitally signed by SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=559498df564ab1121a356349085c1b8e3cc0f12569ba0f7f2090386d4dccb333, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=F7145AF5949FB706E2DCB06C2B209B58FFA369F6E085E02041722C90F0528791, cn=SATYANARAYAN SHIVPRASAD BAJAJ
Date: 2025.03.25 18:11:13 +05'30'

**( सत्यनारायण बजाज )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति**, १. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. मा.राज्यमंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधानसभा विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा. विधानसभा/ विधान परिषद सर्व सदस्य, विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
८. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सचिव, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. कक्ष अधिकारी (ई-१-अ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती / कार्यासन म-१.